# लेव्ही जीन्सची गोष्ट

मायकेल बर्गन



तुम्हाला कोणत्या प्रकारची जीन्स पँट आवडते? निळी जीन्स सुती कापडापासून बनते. तिला *डेनिम* म्हणतात. डेनिम लवचिक आणि मजबूत असते.

कधीकधी निळ्या जीन्सवर हिरे जडवलेले असतात. काही लोक जीन्स पँट गुडघ्यापर्यंत कापून शॉर्ट्स बनवतात. काही लोक कधीही आणि कशावरही निळी जीन्स घालतात. काही लोक त्यांच्या निळ्या जीन्सला वेगवेगळ्या रंगांनी रंगवतात. काही लोक जीन्सला गुडघ्याजवळ भोकं पाडतात. काही लोक जीन्सच्या तळाला झालर करतात.

ही जीन्स पँट एवढी लोकप्रिय कुणी केली, तुम्हाला माहित आहे? त्याचे नाव होते *लेव्ही स्ट्रॉस.* ही त्याचीच गोष्ट आहे.

लेव्ही स्ट्रॉसचा जन्म 1829 साली जर्मनीच्या दक्षिण भागात असलेल्या *ब्युटेनहाइम* गावात झाला. जन्माच्या वेळी त्याचे नाव *लोएब* होते. पण नंतर ते लेव्ही असे बदलले. त्याचे वडील कापड, कपडे, सुया, कात्री वगैरेंसारख्या वस्तू विकत असत.

1830 सालच्या उत्तरार्धात, लेव्हीचे दोन भाऊ, *जोनस* आणि *लुईस* अमेरिकेत गेले. तिथे त्यांना स्वत:चा व्यवसाय उभारायचा होता. 1845 साली लेव्हीच्या वडिलांचे निधन झाले. त्यानंतर लेव्ही जर्मनी सोडून अमेरिकेत गेला आणि भावांसोबत राहू लागला.





1847 साली लेव्ही स्ट्रॉस न्यूयॉर्कला आला. त्याच्या बंधुंनी *जे. स्ट्रॉस अँड कंपनी* या नावाने एक व्यवसाय सुरू केला होता. ते आपल्या वडिलांचाच व्यवसाय पुढे चालवत होते. लेव्ही स्ट्रॉसने हा व्यवसाय शिकून घेतला. मग त्याने स्वतःचा व्यवसाय सुरू करायचे ठरवले.

स्ट्रॉसने अनेक वर्षे केंटकी राज्यात व्यवसाय केला. तो फेरीवाला किंवा फिरता विक्रेता बनून, घरोघरी जाऊन वस्तू विकत असे.

काही वर्षांनंतर स्ट्रॉसने वेगळ्या ठिकाणी व्यवसाय करायचे ठरवले. त्याने *ग्रेट कॅलिफोर्निया गोल्ड रश*बद्दल ऐकले होते. 1848 साली कॅलिफोर्नियात सोन्याच्या खाणी सापडल्या होत्या. हजारो खाणमजूर आणि इतर लोक आपले नशीब फळफळावे आणि श्रीमंत बनावे म्हणून तिथे जात होते. बरेचसे खाणमजूर 1849 साली तिथे गेले, म्हणून त्यांना *फोर्टी-नाइनर्स* म्हणू लागले. स्ट्रॉसला सोन्यामध्ये काही रस नव्हता. त्याने वेगळ्या मार्गाने पैसा कमवायचे ठरवले.

त्याने खाणमजूरांना आणि कॅलिफोर्नियाला येणाऱ्या इतर लोकांना आपला माल विकायचे ठरवले. सर्वाधिक ग्राहक असलेल्या ठिकाणी त्याने आपला व्यवसाय हलवला. चतुर खेळी, नाही का? स्ट्रॉसचे हे पाऊल त्याच्या अपेक्षेपेक्षा कित्येक पटींनी यशस्वी ठरले.

पण नव्या ठिकाणी व्यवसाय करण्यासाठी आता स्ट्रॉसला न्यूयॉर्क ते सॅनफ्रान्सिस्को असा दीर्घ प्रवास करावा लागू लागला. 1853 साली जेव्हा विमाने आणि रेल्वे नव्हती, अशा काळात असा प्रवास सहजसोपा नव्हता.




त्याकाळी बहुतेक लोक अमेरिकेच्या पूर्व किनाऱ्यावरून पश्चिम किनाऱ्यावर जहाजाने जात असत. जरा कल्पना करून पाहा! यासाठी जहाजाला दक्षिण अमेरिकेचे टोक, केप हॉर्नला वळसा घालून प्रशांत महासागरातून पुन्हा उत्तर दिशेत प्रवास करावा लागे. या प्रवासात जहाजांना खवळलेल्या समुद्राला तोंड द्यावे लागे. त्यामुळे कित्येक प्रवासी आजारी पडून किंवा भुकेने मरत. स्ट्रॉस मात्र हा प्रवास करून सुखरूप सॅनफ्रान्सिस्कोला पोहोचला.

सुदैवाने, स्ट्रॉसची बहीण *फॅनी* आणि तिचा पती *डेव्हिड स्टर्न* तिथेच स्थायिक झाले होते. त्यांनी स्ट्रॉसलाही तिथे स्थायिक होण्यास मदत केली. स्टर्न आणि स्ट्रॉस हे दोघे मिळून एक दुकान चालवू लागले. हे दुकान बंदरानजिक होते. दुकानात ते दैनंदिन गरजेचा माल विकू लागले. दुकानासाठी काही माल स्ट्रॉसचे भाऊ न्यूयॉर्कवरून पाठवत. त्यात खाणमजुरांसाठीही कपडे असत. स्ट्रॉसने आपल्या व्यवसायाचे नाव ठेवले, *"लेव्ही स्ट्रॉस"*.

व्यवसायात स्ट्रॉसचा चांगलाच जम बसला. सोन्याच्या शोधात येणाऱ्या लोकांनी सॅनफ्रान्सिस्को शहर फुलून गेले होते. काही वर्षांआधी याच शहरात हजारापेक्षाही कमी लोक राहात असत. पण सोन्याचा शोध लागल्यावर जहाजांमागून जहाजे भरून लोक तिथे येऊ लागले. त्यांतील अनेक लोकांना *सोन्याचा शोधक* म्हणत. यशस्वी शोधक सोन्याच्या लगडी किंवा सोन्याच्या धुळीने भरलेल्या पिशव्या घेऊन सॅनफ्रान्सिस्कोला परतत.

सोने मिळाल्यावर बरेच लोक सॅनफ्रान्सिस्को शहरातच स्थायिक होत. 1850 पर्यंत सुमारे 25,000 लोक अशाप्रकारे या शहरात वसले. स्ट्रॉस येण्यापूर्वी हे लोक तंबूत किंवा लाकडी खोपटात राहात. स्ट्रॉसच्या आगमनानंतर हेच लोक श्रीमंत होऊन मोठमोठ्या घरांमध्ये राहात असल्याचे दिसू लागले.

पण ही सोन्याची स्पर्धा फार काळ राहिली नाही. स्ट्रॉसने व्यवसाय सुरू केला तोवर फार कमी सोने मिळू लागले होते. तरीही लोक कॅलिफोर्नियात येत होते. ते स्ट्रॉसच्या दुकानातून दैनंदिन गरजेच्या वस्तू खरेदी करत. स्ट्रॉसचे ग्राहक सॅनफ्रान्सिस्कोच्या बाहेरही होते. अनेकदा तो जवळच्या पर्वतांमधील खाणकाम चालणाऱ्या शहरांमध्ये माल घेऊन जात असे. तो तेथील छोट्या दुकानांना माल पुरवत असे. तेथील व्यापाऱ्यांचा स्ट्रॉसवर फार विश्वास होता. स्ट्रॉसकडे योग्य किंमतीत उत्तम दर्जाचा माल मिळतो, हे त्यांना ठाऊक होते.



स्ट्रॉसचा व्यवसाय दिवसेंदिवस वाढू लागला. त्याने आपला व्यवसाय अधिक मोठ्या आणि अधिक चांगल्या ठिकाणी हलवला. 1863 साली त्याने आपल्या व्यवसायाचे नाव बदलून *लेव्ही स्ट्रॉस अँड कंपनी* असे ठेवले. तीन वर्षांनी त्याने व्यवसाय पुन्हा नव्या ठिकाणी नेला.

व्यवसायाचे नवे मुख्यालय पूर्वीच्या तुलनेत खूप आकर्षक होते. नव्या इमारतीत गॅसचे आकर्षक दिवे होते. तिथे माल वाहून नेण्यासाठी यांत्रिक लिफ्ट होती. त्याकाळी बऱ्याच कमी इमारतींमध्ये लिफ्ट होत्या. स्ट्रॉसच्या व्यवसायाची भरभराट झाली.

पण लवकरच, त्याच्यापुढे एके मोठे आव्हान उभे ठाकले.



कॅलिफोर्निया राज्य दीर्घ काळापासून तेथील भूकंपांसाठी प्रसिद्ध आहे. सॅनफ्रान्सिस्को शहर तर भूकंपाच्या केंद्रानजिक स्थित आहे. तिथे सतत लहान-मोठे भूकंप होत असतात. 1865 साली स्ट्रॉसने तेथे भूकंपाचा पहिला अनुभव घेतला. त्यात त्याचे फारसे नुकसान झाले नाही. 1868 साली आलेल्या भूकंपाने मात्र संपूर्ण शहर हादरले.





एकामागोमाग दोन भूकंप झाले. दुसरा भूकंप मोठा होता. इमारती हलू लागल्यामुळे लोक रस्त्यावर पळाले. काही इमारती कोसळल्या. त्यात जवळपासचे लोक मारले गेले. असंख्य लोक मृत्युमुखी पडले. स्ट्रॉसच्या कुटुंबातील कुणाला इजा झाली नाही. पण वृत्तपत्रांनुसार, स्ट्रॉसचे कार्यालय असलेल्या इमारतीला मोठी भेग पडली.

स्ट्रॉसने कर्मचाऱ्यांच्या मदतीने कार्यालयातील सामान बाहेर काढले आणि इमारतीची डागडुजी करून घेतली. भूकंपामुळे त्याने व्यवसाय बंद पडू दिला नाही. लवकरच त्याने व्यवसाय पुन्हा सुरू केला.

स्ट्रॉसला तेथील समाजात महत्त्वाचे स्थान होते. तो अनेक दानशूर संस्थांशी संबंधित होता. पूर्व किनाऱ्यावरील युरोपीय आणि अमेरिकन लोकांना कॅलिफोर्नियात स्थायिक होण्यास त्याने मदत केली. साहजिकच, त्याचे समाजातील महत्त्व आणखी वाढले.

1872 साली स्ट्रॉसला जेकब डेव्हिस याचे पत्र आले. डेव्हिस हा नेवाडा राज्यातील रीनो शहरात टेलरिंगचा व्यवसाय करत असे. तो स्ट्रॉसच्या दुकानातून कापड खरेदी करत असे. स्ट्रॉस हा एक यशस्वी तसेच प्रामाणिक व्यावसायिक आहे, असे डेव्हिडचे मत होते. एका नवीन प्रकल्पावर काम करण्यासाठी त्याला स्ट्रॉसची मदत हवी होती.

रीनो शहराजवळ अनेक खाणी होत्या. डेव्हिस खाणमजुरांसाठी पँट शिवत असे. त्यासाठी तो काहीवेळा *डक* नावाचे सुती कापड तर काही वेळा निळे *डेनिम* नावाचे कापड वापरत असे. एकदा एका स्त्रीने तिच्या पतीच्या पँट खिशांजवळ फाटतात, अशी तक्रार केली. डेव्हिसने तिच्या पतीसाठी नवीन पँट शिवल्या. खिशाजवळचे कापड एकसंध राहावे, फाटू नये, म्हणून त्याने धातुच्या पिना वापरल्या. साध्या दोऱ्यापेक्षा या पिना खूप मजबूत होत्या.

डेव्हिसच्या युक्तीमुळे मोठे काम झाले. ही पँट पाहिल्यावर इतर खाणमजुरांनीही तशाच पँटची मागणी केली. डेव्हिसने वर्षभरात अशा दोनशे पँट विकल्या. या पँटची मागणी पाहून डेव्हिसला अशा पँट मोठ्या प्रमाणावर बनवायची इच्छा झाली. पण या पँटची कुणी नक्कल करू नये, म्हणून त्याला त्याचे पेटंट हवे होते. एखादी नवी कल्पना इतर कुणी चोरू नये, यासाठी सरकार पेटंट हे कायदेशीर कागदपत्र देते. पण पेटंटची नोंदणी करण्यासाठी खूप खर्च येतो. तो परवडणारा नव्हता, म्हणून डेव्हिसने स्ट्रॉसची मदत मागितली.

स्ट्रॉसने पेटंटसाठी लागणारी 68 डॉलर्स रक्कम भरावी, व्यवसायात आपल्याला भागीदार करून घ्यावे आणि पँटच्या विक्रितून होणारा नफा वाटून घ्यावा असा प्रस्ताव डेव्हिसने स्ट्रॉसपुढे ठेवला. पँटला पिना लावण्याची कल्पना स्ट्रॉसला खूप पसंत पडली होती. त्यामुळे त्याने डेव्हिसचा प्रस्ताव मान्य केला.





पेटंट मिळवणे, हे काही सहजसोपे काम नव्हते. त्यासाठी ती कल्पना इतर कुणी यापूर्वी वापरलेली नाही, हे संशोधकाला अमेरिकी सरकारसमोर सिद्ध करावे लागते. सुरुवातीला सरकारने डेव्हीसची कल्पना धुडकावून लावली. अमेरिकन नागरी युद्धादरम्यान, एका कंपनीने सैनिकांचे कपडे बनवण्यासाठी धातुच्या पिना वापरल्या होत्या. पण शेवटी, डेव्हिस आणि स्ट्रॉसने आपली कल्पना नवी आहे, हे सरकारच्या गळी उतरवलेच. 20 मे 1873 साली त्यांना पेटंट मिळाले.

काही आठवड्यांतच, *लेव्ही स्ट्रॉस अँड कंपनी*ने खिशाला धातुच्या पिना लावलेल्या पँटची पहिली जोडी विकली. वर्षभरानंतर, स्ट्रॉसने अशाच आणखी 20,000 पँटची विक्री केली.

*लेव्ही स्ट्रॉस अँड कंपनी*ने खिशाला धातुंच्या पिना लावलेल्या पँट बनवण्यासाठी नवे कारखाने सुरू केले. जेकब डेव्हिसने हे कारखाने सांभाळले. कारखान्यात *कटर* म्हणून ओळखला जाणारा कारागीर जाडजूड कापडाला लांबलचक चाकूने कापत असे. मग स्त्रिया शिलाई यंत्राने कापडाचे हे तुकडे जोडून पँट बनवत असत.

स्ट्रॉसच्या कारखान्यातील पँट आकर्षक व टिकाऊ असत. या पँटसाठी वापरले जाणारे डेनिम कुठून येत होते? *डेनिम* हा शब्द फ्रेंच *डे नीम्स* या शब्दांवरून रुढ झाला, असे म्हटले जाते. *डे नीम्स* म्हणजे *नीम्सवरून.* फ्रेंच शहर *नीम्स* हे एके काळी टिकाऊ निळ्या कापसासाठी प्रसिद्ध होते.





पण स्ट्रॉसला डेनिम कापडासाठी फ्रान्सला जावे लागले नाही. न्यू हॅम्पशायर राज्यातील एक कारखाना अमेरिकन नागरी युद्धाच्या काळापासून डेनिम कापड बनवत असे. या कारखान्याने स्ट्रॉसच्या निळ्या जीन्स पँटसाठी डेनिम पुरवले. त्याकाळी या पँटला कुणी *निळी जीन्स* म्हणत नसत, अगदी स्ट्रॉससुद्धा!

पश्चिमेकडील लोकांनी स्ट्रॉसच्या कपड्यांची भरपूर खरेदी केली. कंपनीच्या जाहिरातीत कधीकधी गुराख्यांनी डेनिमची पँट घातल्याचे दाखवत. कॅनडा आणि इतर काही देशांमध्येही या डेनिम कपड्यांची विक्री होऊ लागली. स्ट्रॉसच्या कंपनीचा पसारा वाढू लागला आणि तिचे नाव सर्वतोमुखी झाले.

स्ट्रॉसने कंपनीच्या पँटवर एक विशेष व्यापारी मुद्रा *(ट्रेडमार्क)* लावली. त्यामुळे या पँट स्ट्रॉसच्या कंपनीच्या आहेत, हे ओळखू येऊ लागले. पँटच्या मागच्या खिशावर नारिंगी धाग्यांनी V आकारात दोन रेषा शिवण्यात आल्या. आजदेखील *लेव्ही जीन्स* हाच ट्रेडमार्क वापरते.

1880 च्या काळात, स्ट्रॉसने पँटमागे चामड्याचे लेबल लावले. त्यावर दोन घोडे पँटला दोन बाजुंनी ओढत आहेत, असे दिसते. जणू लेबल म्हणते, “कितीही ताकद लावा, पँट फाटणार नाही.” पँट फाटली तर ग्राहकांना नवीन पँट देण्याचे आश्वासन कंपनीने दिले. त्यामुळे काही लोक या पँटला *दोन घोड्यांची पँट* असेही म्हणत.

पँटच्या व्यवसायामुळे स्ट्रॉस सॅनफ्रान्सिस्कोतील एक श्रीमंत व्यक्ती बनला. तो शहरातील काही हॉटेल आणि इमारतींचाही मालक बनला. त्याने लोकर उत्पादन करणारा एक कारखाना सुरू केला. या लोकरीचा थर दिल्याने त्याच्या कंपनीचे कपडे ऊबदार बनले.

स्ट्रॉसचे वय वाढत गेले तसे त्याने व्यवसायातील लक्ष कमी केले. त्याचे पुतणे कंपनीचा दैनंदिन कारभार पाहू लागले. स्ट्रॉसने इतर कंपन्यांवर लक्ष केंद्रित केले. तो त्यांच्या संचालक मंडळात सहभागी होऊन कंपन्यांसाठी दीर्घ काळाचे नियोजन करू लागला. स्ट्रॉसने गरजू लोकांची मदत करणाऱ्या संस्थांसोबतही काम केले. त्याने तरुण विद्यार्थ्यांना कॅलिफोर्निया विद्यापीठात शिकण्यासाठी आर्थिक मदत केली.

1902 साली स्ट्रॉसची तब्येत बिघडली. 26 सप्टेंबर रोजी रात्री त्याचे झोपेतच निधन झाले.





स्ट्रॉसच्या मृत्यूची खबर सॅनफ्रान्सिस्कोतील वृत्तपत्रांमध्ये पहिल्या पानांवर झळकली. शेकडो लोक त्याच्या अंत्यविधीसाठी जमले. त्यात स्ट्रॉसच्या कंपनीशी व्यवहार करणाऱ्या श्रीमंत व्यापाऱ्यांसोबतच त्याच्या कारखान्यांतील गरीब मजूरदेखील होते. शहरातील काही लोकांनी या दिवशी आपले व्यवसाय बंद ठेवले.

स्ट्रॉसच्या मृत्यूनंतर त्याच्या पुतण्यांनी त्याचा व्यवसाय पुढे सुरू ठेवला.

काही वर्षांनंतर, सॅनफ्रान्सिस्कोवर पुन्हा निसर्गाची अवकृपा झाली. 1868 सालच्या भुकंपापेक्षाही मोठा भूकंप तिथे झाला. भूकंपात गॅस वाहून नेणारे पाईप फुटल्यामुळे मोठ्या आगी लागल्या. कित्येक दिवस या आगींच्या ज्वाळा धुमसत होत्या. या आगींमध्ये स्ट्रॉसच्या साऱ्या कार्यालयीन इमारती भस्मसात झाल्या. स्ट्रॉसच्या पुतण्यांनी तेच केले जे स्ट्रॉसने स्वत: केले असते. त्यांनी कंपनीचा डोलारा पुनश्च उभारायला सुरुवात केली.



*लेव्ही स्ट्रॉस अँड कंपनी* पुन्हा जोमाने उभी राहिली. कंपनीने प्रसिद्ध निळ्या डेनिम पँटमध्ये काही बदल केले. पँटच्या पुढच्या बाजुस असलेल्या बटणांच्या जागी आता झीप (चैन) दिसू लागली. कंपनीने एक नवा ट्रेडमार्क म्हणून मागच्या खिशावर एक छोटे लाल लेबल शिवले आणि त्यावर कंपनीचे नाव छापले.

डेनिम पँटला अनेक नावांनी ओळखले जाऊ लागले. 1942 साली कंपनीने त्याला *लेव्हिज* हे अधिकृत नाव दिले. नंतर, तरूण मुले त्याला *जीन्स* म्हणू लागली. खाणमजूर वापरत त्या पँटच्या कापडावरून हे नाव रुढ झाले.

नाव काहीही असो, आपल्या कंपनीच्या पँट लोक दीर्घ काळ वापरत आहेत, हे पाहून स्ट्रॉसला नक्कीच आनंद झाला असता.



**समाप्त**

